**शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून राज्यात व्यावसायिक पदवी, पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने शासन मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.टीईएम-२०१८/प्र.क्र.१३/१८/तांशि-४/शिकाना**
शिबीर कार्यालय, हैद्राबाद हाऊस,
सिव्हील लाईन्स, नागपूर ४४०००१.
दिनांक : १० जुलै, २०१८

वाचा : १) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.वेस्टर्न/१-३५०८१८५५२७/२०१८/ईओए/कॉरिजेन्डम-१, दिनांक ४/७/२०१८
२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक २/एनजीसी/मान्यता/२०१८/८८९, दि. ५.०७.२०१८

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी उपरोक्त संदर्भ क्र.१येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संचालक, तंत्र शिक्षण यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून डॉ.डी.वाय.पाटील इन्स्टिट्युट ऑफ टेक्नॉलॉजी, पिंपरी, पुणे या संस्थेत "इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी" हा ६० प्रवेश क्षमता असलेला नवीन पदवी अभ्यासक्रम अनिवासी भारतीयांच्या मुलांच्या (NRI)जागांसह सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत शासनास प्रस्तावित केले आहे.

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संचालक, तंत्र शिक्षण यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून डॉ.डी.वाय.पाटील इन्स्टिट्युट ऑफ टेक्नॉलॉजी, पिंपरी, पुणे या संस्थेत "इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी " हा ६० प्रवेश क्षमता असलेला नवीन पदवी अभ्यासक्रम अनिवासी भारतीयांच्या मुलांच्या (NRI)जागांसह सुरु करण्यास मान्यता देण्याची शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संचालक, तंत्र शिक्षण यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून डॉ.डी.वाय.पाटील इन्स्टिट्युट ऑफ टेक्नॉलॉजी, पिंपरी, पुणे या संस्थेत "इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी" हा ६० प्रवेश क्षमता असलेला नवीन पदवी अभ्यासक्रम अनिवासी भारतीयांच्या मुलांच्या (NRI)जागांसह सुरु करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे :

१. सदर मंजूरी यापूर्वी अशा अभ्यासक्रमास मंजूरी देताना विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहिल.

२. प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

३. शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४. सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५. संबंधित संस्थेने संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६. सदर पदवी व पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

७. शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षक वृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत.तसेच शिक्षक वृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादी बाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९. संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे.तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयी सुविधा (उदा.प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१०. संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे.तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा.प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

११. रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

१२. संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नसल्यास, त्या संस्थेकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

१३. संस्थेस सदर अभ्यासक्रम बंद करावयाचा झाल्यास तो विहीत कार्यपद्धतीचा अवलंब करून टप्प्याटप्प्याने सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने बंद करता येईल. मात्र, एकाच वेळी या अभ्यासक्रमाचे सर्व वर्ग बंद केल्यास संस्थेने संयुक्त खात्यात ठेवलेली संचित ठेव शासन जमा करण्यात येईल.

१४. या शिवाय संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७१०१६४५२१६१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.07.11 15:39:47 +05'30'

**(संजय औ.धारुरकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
३. कुलसचिव, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
४. डॉ.डी.वाय.पाटील इन्स्टिट्युट ऑफ टेक्नॉलॉजी, संत तुकाराम नगर, पिंपरी, पुणे - ४११००८ (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली- ११० ००१.
८. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण भाग), नवी दिल्ली.
९. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई
१०. निवड नस्ती/तांशि-४